GR-200404051106150001-0100



प्रलंबित विभागीय चौकशीचा जलद निपटारा होण्याच्या दृष्टीने प्रकरणांचे पुनर्विलोकन करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक-सीडीआर-1691-प्र.क्र.149-91-11-अ,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 5 जानेवारी 1993.

## परिपत्रक

राज्यातील वर्ग-1 व वर्ग-2 मधील शासकीय अधिकारी तसेच वर्ग-3 व वर्ग-4 मधील अराजपत्रित कर्मचा-यांविरूध्द प्रलंबित असलेल्या विभागीय चौकशा लवकरात लवकर पूर्ण करण्याच्या दृष्टीने अशा प्रकरणांचे वेळोवेळी पुनर्विलोकन करणे आवश्यक आहे. म्हणून शासनाने दिनांक 1 जानेवारी, 1989 पासून सामान्य प्रशासन विभागामध्ये एक संनियंत्रण कक्ष स्थापन केला आहे. या संनियंत्रण कक्षाचे अधिकारी प्रत्येक विभागीय मुख्यालयाला वर्षातून दोन वेळा भेट देऊन त्या विभागातील प्रलंबित विभागीय चौकशी प्रकरणांबाबत संबंधित अधिका-यांच्या बरोबर चर्चा करून आढावा घेतात. गेल्या 3 वर्षात संनियंत्रण कक्षाच्या अधिका-यांनी तपासलेल्या प्रकरणांवरून स्थानिक पातळीवरील अधिका-यांना खालील मुद्यांवर मार्गदर्शन हवे असते असे दिसून आले आहे:-

(1) निलंबनाधीन कर्मचा-यांच्या निलंबनाचे पुनर्विलोकन करून निलंबन चालू ठेवावे किंवा कसे,

(2) शासकीय कर्मचा-याला न्यायालयीन शिक्षा दिली असल्यास व त्याच्याविरूध्द कर्मचा-याने अपील दाखल केले असल्यास कोणती कार्यवाही करावी.

(3) विभागीय चौकशीची कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर शिक्षा देण्यासंबंधीची करावयाची कार्यवाही.

(4) विभागीय चौकशीची कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर व शिक्षा देण्याची कार्यवाही पूर्ण होण्यापूर्वी निलंबित कर्मचा-यांच्या बाबतीत कोणती कार्यवाही करावी.

त्याचप्रमाणे प्रकरणांची छाननी करतांना असे निदर्शनास आले की, विभागीय चौकशी ठराविक कालामध्ये पूर्ण न होण्याची खालील प्रमाणे काही महत्वाची कारणे आहेत:-

(1) शिस्तभंग विषयक प्राधिका-याने निर्देशित केलेले साक्षीदार वेळेवर साक्षीसाठी उपस्थित रहात नाहीत.

(2) शिस्तभंग विषयक प्राधिका-याकडून चौकशीसाठी आवश्यक असलेले दस्तऐवज चौकशी अधिका-यांना उपलब्ध करून दिले जात नाहीत.

(3) अपचारी कागदपत्राची छाननी एकाच वेळी न करता ती टप्प्याटप्प्याने करतो व त्यासाठी वेळ मागत असतो.

(4) सादरकर्ता अधिका-याकडून लेखी टाचण चौकशी अधिका-याला देण्यास विलंब होतो.

(5) चौकशी अधिकारी/सादरकर्ता अधिका-यांच्या मुदतपूर्व बदल्या करण्यात येतात.

(6) एकाच प्रकरणात गुंतलेल्या विविध विभागातील शासकीय कर्मचा-याविरूध्द शिस्तभंगाची कार्यवाही एकाच वेळी चौकशी अधिका-याकडे न सोपविता ती टप्प्याटप्प्याने सोपविण्यात येते.

2. विभागीय स्तरावर संनियंत्रण कक्षाकडून संबंधित प्रकरणाचे पुनर्विलोकन करण्यात येत असतांना पुनर्विलोकनाच्या वेळी संबंधित शिस्तभंग विषयक प्राधिका-यांच्या कार्यालयातील जबाबदार अधिकारी उपस्थित रहात नाहीत. ब-याच वेळा विभागीय चौकशांची प्रकरणे न हाताळणारे कनिष्ठ अधिकारी/कर्मचारी उपस्थित रहातात. असे अधिकारी/कर्मचारी एकतर प्रलंबित विभागीय चौकशी संबंधीच्या प्रकरणाशी अनभिज्ञ असतात किंवा त्यांना अशा प्रकरणांसंबंधी विचारलेल्या कोणत्याही प्रश्नाचे उत्तर देता येत नाही. अशा वेळी प्रलंबित प्रकरणांचे पुनर्विलोकन करुन प्रकरणांना गती देण्याचा उद्देश सफल होत नाही. पुनर्विलोकनाच्या वेळी शक्यतो अशी प्रकरणे हाताळणारे जबाबदार वरिष्ठ अधिकारी किंवा त्यांच्या अनुपस्थितीत संबंधित प्रकरण हाताळणारे वर्ग-3 चे वरिष्ठ कर्मचारी यांना पाठविण्याची दक्षता शिस्तभंगविषयक प्राधिका-याने घ्यावी. कारण ब-याच प्रकरणांमध्ये चर्चेच्या वेळी वरील परिच्छेद 1 मध्ये नमूद केलेल्या मुद्यांवर शिस्तभंग विषयक प्राधिका-याने करावयाच्या कार्यवाहीसंबंधी सल्ला देण्यात येतो. हा सल्ला साहजिकच तोंडी स्वरुपात असल्यामुळे या सल्ल्यानुसार कार्यवाही होण्याच्या दृष्टीने जबाबदार अधिका-यांनी उपस्थित रहाणे जास्त संयुक्तिक आहे.

3. सामान्य प्रशासन विभागात येणा-या शिस्तभंग विषयक प्रकरणांच्या छाननी वरुन असे दिसून येते की, ब-याच वेळा दोषारोपपत्र शिस्तभंग विषयक प्राधिका-यांच्या कार्यालयात तयार न करता ते त्यांना दुय्यम, असलेल्या अधिका-यांकडून करुन घेतात. असे दोषारोपपत्र शिस्तभंग विषयक प्राधिका-याच्या कार्यालयात प्राप्त झाल्यानंतर ते सक्षम प्राधिका-यांची मंजूरी देऊन अपचा-यावर बजावण्यात येते. असेदोषारोपपत्र बजावतांना ज्या कागदपत्रांच्या आधारावर ते तयार करण्यात येते ते कागदपत्र शिस्तभंग विषयक प्राधिकारी आपल्या ताब्यात घेत नाहीत. अपचा-याने दोषारोप अमान्य केल्यानंतर दोषारोपाची छाननी करण्यासाठी चौकशीचे काम चौकशी अधिका-याकडे सोपविण्यात येते. हे काम सोपवितांना शिस्तभंग विषयक प्राधिकारी ब-याचवेळा ज्या कागदपत्राच्या आधारे दोषारोपपत्र तयार करतात ते कागदपत्र चौकशी अधिका-यांकडे पाठवित नाहीत. त्याऐवजी शिस्तभंग विषयक प्राधिकारी, ज्या कार्यालयाच्या ताब्यात असे कागदपत्र असतात, त्या कार्यालयाला फक्त सूचना देवून मुक्त होतात. परंतु त्यांच्या सूचनानुसार कागदपत्र चौकशी अधिका-याकडे पाठविले जातात किंवा नाही याची खात्री करुन घेण्यात येत नाही. पर्यायाने चौकशी अधिका-याला कागदपत्र उपलब्ध होत नाहीत. त्यामुळे त्यांना चौकशीचे काम सुरु करता येत नाही. कोणताही आरोप साक्षीपुरावे व कागदपत्रांची संपूर्ण छाननी केल्याशिवाय तसेच अपचारी व चौकशी अधिका-याची खात्री पटल्याशिवाय सिध्द होतो किंवा नाही याचा चौकशी अधिका-यांना निष्कर्ष काढता येत नाही, याची सर्व शिस्तभंग विषयक प्राधिका-यांना कल्पना आहे.

4. वरील परिच्छेदामध्ये विषद केलेली परिस्थिती टाळण्यासाठी व चौकशीचे काम विहित मुदतीत पूर्ण करण्याच्या उद्देशाने तसेच प्रलंबित विभागीय चौकशीच्या प्रकरणांचा पुनर्विलोकनाचा उद्देश सफल होण्यासाठी वरील परिस्थितीचा गंभीरपणे विचार करुन त्यामध्ये सुधारणा करणे आवश्यक आहे या निर्णयाप्रत शासन आले आहे. या सर्व परिस्थितीचा विचार करुन शासन खालीलप्रमाणे निदेश देत आहे:-

(1) शिस्तभंग विषयक प्राधिका-याने त्यांच्या कार्यालयात सध्या प्रलंबित असलेल्या तसेच भविष्यात सुरु होणा-या विभागीय चौकशीच्या कामकाजासाठी त्यांच्या कार्यालयातील एका वरिष्ठ अधिका-याची संनियंत्रण अधिकारी म्हणून नियुक्ती करावी. व सदर अधिका-याचे नाव सामान्य प्रशासन विभागाला कळवावे.

(2) संनियंत्रण अधिका-याने विभागीय चौकशीच्या प्रकरणामध्ये दोषारोपपत्र बजावून विभागीय चौकशीची कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर अपचा-याला विभागीय चौकशी संबंधीचे अंतिम आदेश देण्यात येईपर्यन्तच्या सर्व कारवाईचे संनियंत्रण करणे आवश्यक राहील.

(3) शिस्तभंग विषयक प्राधिका-याने ज्या कागदपत्रांच्या आधारे दोषारोपपत्र तयार केले ते कागदपत्र दोषारोपपत्र अपचा-यावर बजावण्याच्या वेळी संनियंत्रण अधिका-याच्या ताब्यात द्यावेत.

एच-802(5000-1-93)-1अ

(4) संनियंत्रण अधिका-याने संबंधित अपचा-यावर दोषारोपपत्र बजावून चौकशीचे कामकाज चौकशी अधिका-याकडे सोपविण्यात येईपर्यन्त चौकशीचे कागदपत्र आपल्या ताब्यात ठेवावीत. ही कागदपत्रे गहाळ झाल्यास किंवा हरविल्यास त्यांना व्यक्तिशः जबाबदार धरले जाईल. तसेच चौकशी अधिका-यांस हवी असलेली कागदपत्रे पुरविण्याची जबाबदारीही त्यांचेवर राहील.

(5) दोषारोपपत्राच्या अनुषंगाने अपचा-याने दिलेले बचावाचे निवेदन किंवा अपचा-याने बचावाचे निवेदन सादर न केल्यामुळे शिस्तभंग विषयक प्राधिका-याने एकतर्फी चौकशी सुरु करावयाचे ठरविल्यास, शिस्तभंग विषयक प्राधिका-याने दोषारोपपत्र, अपचा-याचे निवेदन संनियंत्रण अधिका-यामार्फत चौकशी अधिका-याकडे द्यावीत.

(6) संनियंत्रण अधिका-याने महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, 1979 मधील नियम 8 अनुसार चौकशीसाठी आवश्यक असलेली सर्व कागदपत्रे एकत्र जमवून ती शिस्तभंग विषयक प्राधिका-याने नेमणूक केलेल्या चौकशी अधिका-याकडे सुपूर्द करावीत.

(7) संनियंत्रण अधिका-याने दोषारोपपत्रामध्ये उल्लेख केलेले साक्षीदार चौकशी अधिका-याने नेमून दिलेल्या तारखांना न चुकता हजर रहातील याची दक्षता घ्यावी. या साक्षीदारांना संनियंत्रण अधिका-याने स्पष्ट कल्पना द्यावी की, जर ते चौकशी अधिका-यांनी नेमून दिलेल्या तारखांना उपस्थित राहिले नाहीत तर त्यांच्याविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, 1979 नुसार कार्यवाही करण्यात येईल.

(8) चौकशी अधिका-याला चौकशीच्या कार्यवाहीशी संबंधित असलेले अतिरिक्त कागदपत्र हवे असल्यास ते संनियंत्रण अधिका-याने शिस्तभंग विषयक प्राधिका-याकडून प्राप्त करुन घेऊन चौकशी अधिका-याला विनाविलंब उपलब्ध करुन द्यावेत.

(9) संनियत्रण अधिका-याने चौकशी अधिकारी तसेच सादरकर्ता अधिकारी यांच्याबरोबर वेळोवेळी संपर्क साधून चौकशीच्या प्रकरणात योग्य ती प्रगती होते किंवा नाही याची खात्री करावी. ज्या प्रकरणांमध्ये विलंब होत आहे असे निदर्शनास आल्यास ती प्रकरणे शिस्तभंग विषयक प्राधिका-याच्या निदर्शनास आणून त्यांच्याकडून योग्य ते आदेश प्राप्त करुन घ्यावेत व चौकशीच्या कामाला योग्य ती गती मिळेल याची दक्षता घ्यावी.

(10) ज्या चौकशी प्रकरणात संबंधित शिस्तभंग विषयक प्राधिकारी खात्याचा सादरकर्ता अधिकारी नेमतो त्या चौकशीमध्ये सादरकर्ता अधिकारी वारंवार बदलणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

5. वर नमूद केल्याप्रमाणे विभागीय चौकशीच्या कामामध्ये योग्य ती गती ठेवण्याच्या उद्देशाने संनियंत्रण अधिका-याची नेमणूक करण्यात आली असली तरी त्यामुळे शिस्तभंग विषयक प्राधिकारी, चौकशी अधिकारी व सादरकर्ता अधिकारी यांच्यावरील जबाबदारी कमी होत नाही याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

6. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-सीडीआर-1190-377-सीआर-13-11 अ (1), दिनांक 15 मे 1990 मध्ये अशा सूचना देण्यात आलेल्या आहेत की, शिस्तभंग विषयक प्राधिका-याने चौकशी संबंधिचे कागदपत्र उपलब्ध करुन दिले नसतील तर चौकशी अधिका-याने चौकशीचे दोषारोपपत्र व इतर कागदपत्र शिस्तभंग विषयक प्राधिका-याकडे परत करावीत. वरील परिच्छेदामध्ये विषद केल्याप्रमाणे कार्यवाही केल्यानंतर चौकशी अधिका-यांना कागदपत्राअभावी चौकशीचे कामकाज थांबवून कागदपत्र शिस्तभंग विषयक प्राधिका-याकडे परत करण्याची आवश्यकता रहाणार नाही.

7. वरील परिच्छेद 1 मध्ये विभागीय चौकशा प्रलंबित रहाण्याचे एक कारण असे नमूद करण्यात आले आहे की, चौकशी अधिकारी/सादरकर्ता अधिकारी यांच्या मुदतपूर्व बदल्या करण्यात येतात. चौकशी अधिकारी/सादरकर्ता अधिकारी यांच्या नेमणूका अतिरिक्त जिल्हाधिकारी, निवडश्रेणी उपजिल्हाधिकारी, उपजिल्हाधिकारी व तहसिलदार या

संवर्गातून करण्यात येतात. या पदावरील नेमणूका करण्याचे अधिकार मुख्य सचिवांना आहेत. परंतु सामान्य प्रशासन विभागाच्या असे निदर्शनास आले आहे की, मुख्य सचिवांनी मान्यता दिलेल्या नेमणूका परस्पर बदल्या करुन बदलण्यात येतात. त्याप्रमाणे चौकशी अधिकारी/सादरकर्ता अधिका-यांच्या कार्यालयातील कर्मचारी महसूल विभागातील संबंधित संवर्गातून घेण्यात येतात. विभागीय चौकशीच्या कामासाठी जी यंत्रणा निर्माण केलेली आहे त्यामुळे संबंधितांना पदोन्नतीच्या संधी उपलब्ध झालेल्या आहेत. तथापि चौकशी अधिकारी/सादरकर्ता अधिका-याच्या कार्यालयातील अधिकारी/कर्मचा-यांच्या वारंवार बदल्या केल्यामुळे चौकशीच्या प्रकरणांना गती येत नाही. विभागीय चौकशी संबंधिचे हे काम प्रशासनाच्या दृष्टीने जिव्हाळयाचे आहे. यामुळे हे काम दीर्घकाळ प्रलंबित न ठेवता त्यावर लवकरात लवकर निर्णय होण्याच्या दृष्टीने शासनाने ही यंत्रणा निर्माण केलेली आहे. ही यंत्रणा प्रभावीपणे कार्यक्षम होण्याच्या दृष्टीने महसूल विभागाने या यंत्रणेतील अधिकारी/कर्मचा-यांच्या वारंवार बदल्या होणार नाहीत याची दक्षता घ्यावी. यापुढे कोणत्याही परिस्थितीत एकदा नेमणूक केलेल्या कर्मचा-यांच्या त्यांनी त्या पदावर कमीत कमी 3 वर्षांची सेवा केल्याशिवाय, पदोन्नतीचे प्रसंग वगळता, बदल्या होणार नाहीत हे पहावे. ज्या वेळी 3 वर्षाच्या कार्य-काळापूर्वी अधिका-याच्या बदल्या करणे आवश्यक आहे असे विभागीय आयुक्तांना वाटत असल्यास, विभागीय आयुक्तांनी तसा प्रस्ताव महसूल व वन विभागास पाठवावा, व त्या विभागाने सामान्य प्रशासन विभागाच्या विचारविनिमयाने या प्रस्तावावर कार्यवाही करावी. यापुढे या आदेशाचे उल्लंघन होणार नाही याची संबंधितांनी दक्षता घ्यावी.

8. सामान्य प्रशासन विभागातील संनियंत्रण कक्षाला प्रत्येक प्रकरणाचे सखोल पुनर्विलोकन करणे, प्रलंबित प्रकरणांची मोठी संख्या लक्षात घेता शक्य नाही. विभागीय स्तरावरील पुनर्विलोकनाच्या वेळी प्रामुख्याने दीर्घकाळ प्रलंबित असलेल्या व निलंबनाधीन कर्मचा-यांच्या विभागीय चौकशीची प्रकरणे तपासली जातात. इतर प्रलंबित प्रकरणांचे वेळोवेळी पुनर्विलोकन करण्याचे काम विभाग प्रमुखाचे आहे.

9. विभाग प्रमुखांनी वरील क्रमांक 4 येथील परिच्छेदात नमूद केलेल्या विशिष्ट अधिका-यांकडे हे काम सोपवून त्यांच्या विभागातील प्रलंबित प्रकरणांचे वेळोवेळी पुनर्विलोकन करावे व प्रलंबित प्रकरणे लवकरात लवकर निकालात काढण्याची कार्यवाही करावी.

10. सर्व मंत्रालयीन विभागांनी तसेच मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुखांनी वर नमूद केलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

एस. शंकर मेनन,
प्रधान सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन.

प्रति

1. राज्यपालांचे सचिव, मुंबई,
2. मुख्य मंत्र्यांचे सचिव, मुंबई,
3. मुख्य सचिव व शासनाचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
4. सर्व विभागीय आयुक्त,
5. सर्व जिल्हाधिकारी,
6. सर्व प्रादेशिक विशेष अधिकारी, विभागीय चौकशा,
7. सर्व जिल्हा चौकशी अधिकारी, विभागीय चौकशा,
8. सर्व सादरकर्ता अधिकारी,
9. मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
10. सर्व मंत्रालयीन विभाग,
11. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
12. निवड नस्ती.

---